**नंदूरबार येथील पीर तलाव संवर्धनाचा प्रस्ताव रद्द करण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रासयो-२०१०/प्र.क्र.११३/तां.क.३**
मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
दिनांक: २७ ऑक्टोबर, २०१५

**वाचा:**

१) **या विभागाचा शासन निर्णय क्र.रासयो-२०१०/प्र.क्र.११३/तां.क.३, दि.१५ जानेवारी,२०११ व दि.१३ डिसेंबर,२०११.**
२) **दिनांक ५ फेब्रुवारी, २०१५ रोजीचे सुकाणू समितीच्या बैठकीचे इतिवृत्त**
३) **दिनांक २९ ऑगस्ट, २०१५ रोजीचे आढावा बैठकीचे इतिवृत्त**

**प्रस्तावना:**

राज्यातील तलाव, सरोवरे व मोठे जलाशय यांचे पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धन करण्यासाठी राज्य शासनाने राज्य सरोवर संवर्धन योजना सन २००६-०७ या वर्षापासून सुरू केली आहे.या योजनेतंर्गत पीर तलाव संवर्धन प्रस्तावास सन २०१०-११ मध्ये एकूण रु. ४,१०,६२,६८०/- (अक्षरी रु. चार कोटी दहा लक्ष बासष्ट हजार सहाशे ऐंशी फ़क्त) एवढ्या रकमेच्या खर्चास काही अटी व शर्तीच्या अधिन राहून मान्यता देण्यात आलेली. सदर योजने खालील संवर्धन कामास राज्य शासनाच्या हिस्स्यापैकी अनुक्रमे दि १५.जानेवारी २०११ व दि.१३ डिसेंबर,२०११ रोजी एकूण रु. २५०.०० लक्ष वितरीत (अक्षरी रु. दोन कोटी पन्नास लक्ष) वितरीत करण्यात आलेले आहेत. परंतु चार वर्षाचा कालावधी उलटूनही सदर निधी संपूर्ण खर्ची न झाल्याने तसेच मंजूर कामापैकी बहूतांश कामे पूर्ण झाली नसल्याचे अढळल्याने याशिवाय तलावांतर्गत राबविण्यात येत असलेल्या कामांचा आढावा घेण्यासाठी आयोजित करण्यात येत असलेल्या बैठकांना मुख्याधिकारी वारंवार अनुपस्थित राहून नंदूरबार नगरपरिषद सदर प्रकल्प राबविण्याबाबत गंभीर नसल्याचे प्रकर्षाने निर्दशनास आले. तसेच वारंवार सूचना/ पत्रव्यवहार करुनही संबंधित स्थानिक यंत्रणेमार्फ़त उपक्रम राबविण्यास होत असलेल्या विलंबाबाबत कारणमिंमासा, सकारात्मक प्रतिसाद प्राप्त होत नसल्याने व तदनंतर दि. २९ ऑगस्ट, २०१५ रोजीच्या आढावा बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार मुख्याधिकारी, नदूंरबार नगरपरिषद यांना अंतिम सुचना देऊन दि. ३० सप्टेंबर, २०१५ पर्यंत व्यक्तीशः भेटून विलंबाबाबतची कारणमिमांसा व उर्वरित कामे पूर्ण करण्यासाठीचे नियोजन इत्यादी बाबत विभागास अवगत न केल्याने दि. २९ ऑगस्ट, २०१५ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार सदर प्रस्ताव रद्द करुन मंजूर व मुक्त करण्यात आलेला संपूर्ण निधी (व्याजासह), शासन जमा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

पीर तलाव पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धीत करण्यासाठी एकूण रु.४,१०,६२,६८०/- (अक्षरी रु. चार कोटी दहा लक्ष बासष्ट हजार सहाशे ऐंशी फ़क्त) एवढ्या खर्चाच्या प्रस्तावास विभागाने मान्यता दिलेली होती. सदर मंजुर एकूण रकमेपैकी ८०% म्हणजेच रु. ३,२८,५०,१४४/- राज्य शासन हिस्सा व २०% म्हणून रु.८२,१२,५३६/- नंदूरबार नगरपरिषद यांचा हिस्सा समाविष्ट होता. मंजूर राज्यशासन हिस्स्यापैकी शासनाने नंदूरबार नगरपरिषदेस रु. २५०.०० लक्ष (अक्षरी रु. दोन कोटी पन्नास लक्ष) संदर्भाधीन क्र.१ च्या दि. १५जानेवारी, २०११ व दि.१३ डिसेंबर, २०११ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आले होते.

२. प्रस्तावित योजनेनुसार पीर तलाव पर्यावरणीय दृष्ट्या संवर्धीत करण्याबाबतची कामे करावयाची होती. तसेच दि.१३ डिसेंबर, २०११ रोजीच्या शासन निर्णयात नमूद केल्यानुसार नगरपरिषदेने स्थानिक स्वराज्य संसथेच्या हिस्स्यापैकी रु. २५.०० लक्ष जमा केला असून आतापर्यंत Retaining wall व De-silting या कामांसाठी एकूण रु. २०४.४५ लक्ष खर्ची पडल्याचे संबंधित नगरपरिषदेच्या प्रतिनिधीनी दि. २९ ऑगस्ट, २०१५ रोजीच्या आढावा बैठकीत नमूद केले. प्रस्तावांतर्गत मंजूर कामे, चार वर्षाचा कालावधी उलटूनही पूर्ण न झाल्याने तसेच दि. २९ ऑगस्ट, २०१५ रोजीच्या आढावा बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार संबंधितांनी विलंबाबाबतची कारणमिमांसा विहित कालावधीत विभागास सादर न केल्याने सदर नगरपरिषदेस मंजूर केलेली प्रस्तावित योजना व निधी या शासन निर्णयाद्वारे रद्द करण्यात येत आहे.

३. या शासन निर्णयाद्वारे नंदूरबार, नगरपरिषदेस वितरीत करण्यात आलेला एकुण निधी रू. २५०.०० (अक्षरी रु. दोन कोटी पन्नास लक्ष फ़क्त) व त्यावरील संपूर्ण व्याज असा एकत्रित निधी वित्त विभागामार्फ़त निर्गमित शासन परिपत्रक क्र. बीजीटी-२०१५/प्र.क्र ७१/अर्थसंकल्प-२ दि.४ मार्च २०१५ मधील परिच्छेद १ मधील (२) नुसार मागणी क्र. यू-४, मुख्यलेखाशिर्ष (३४३५ ०१८२) गौणशिर्ष ९१२- अखर्चित निधीची वजा वसूली असे नमूद करुन भरणा करण्यात यावा. उपरोक्त कार्यवाही ही वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. संकीर्ण १०.१५/ प्र.क्र.१८, अर्थोपाय दि. २५ ऑगस्ट, २०१५ तसेच दि. २९ ऑगस्ट, २०१५ रोजी आयोजित बैठकीच्या निर्णयान्वये होत असली तरी स्थानिक जलस्त्रोतांचे (तलावांचे) पर्यावरणीयदृष्ट्या संरक्षण करणे ही प्रामुख्याने स्थानिक यंत्रणेची जबाबदारी असते. सबब, उपरोक्त तलावातील पाणी कोणत्याही बाह्य स्त्रोतांमार्फ़त दूषित/प्रदूषित होणार नाही याची सर्वस्वी जबाबदारी स्थानिक यंत्रणेचे प्रमुख म्हणून मुख्याधिकारी, नदूंरबार नगरपरिषद यांची असेल.

४. सदर प्रस्तावासंबंधित आतापर्यंत झालेल्या एकूण खर्चाचे बाबनिहाय तपशिल, विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र, राबविलेल्या कामांचा गुणवत्ता अहवाल तसेच राबविलेल्या कामांत काही अनियमतता असण्याची शक्यता पडताळून आवश्यक ती चौकशी करुन कामे योग्य प्रकारे राबविली गेली नसल्यास संबंधित आधिकारी/कर्मचारी/संस्था/कंत्राटदार/ठेकेदार यांच्यावर शासन नियमांनुसार गुन्हा दाखल करुन केलेल्या कार्यवाहीचा अहवाल विभागास तातडीने सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२७१५२१०८७२०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Somnath Namdeo Bagul

Digitally signed by Somnath Namdeo Bagul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac844331c4116879d, cn=Somnath Namdeo Bagul
Date: 2015.11.04 17:50:19 +05'30'

**सो.ना.बागुल**
**उपसचिव, पर्यावरण विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव

३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र १/२,मंबई/ नागपूर.
४. जिल्हाधिकारी, जिल्हा कार्यालय, नंदूरबार.
५. मुख्याधिकारी, नंदूरबार नगरपरिषद, नंदूरबार.
६. संचालक, नगरपालिका प्रशासन वरळी, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मंबई.
८. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
९. मा.मंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
१०. मा.राज्यमंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
११. अपर मुख्य सचिव, पर्यावरण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
१२. प्रधान सचिव, नगरविकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.
१३. वित्तविभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१४. नियोजन विभाग, कार्यासनक्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
१५. रोखशाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती.